तहसिलदार संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. पदोन्न-३०२२/प्र.क्र.२०६/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०५ जुलै, २०२३

<u>संदर्भ</u>:- १) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-३०२२/प्र.क्र.२०६/ई-३, दि.२०.०४.२०२३
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-३०२२/प्र.क्र.२०६/ई-३, दि.०१.०६.२०२३

**शासन आदेश:-**

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन आदेशान्वये श्री. एम.आर.हरणे, नायब तहसिलदार वेतनश्रेणी एस-१४ (रू. ३८६००-१२२८००) यांना तहसिलदार संवर्गात वेतनश्रेणी एस-१९- (रू. ५५१००-१७५१००) या आदेशातील नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली आहे.

महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०२१ विचारात घेऊन निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या श्री. एम.आर.हरणे, तहसिलदार यांना खालील तक्त्यात स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महसूली विभाग वाटपानुसार पदस्थापना देण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वाटप केलेला महसूल विभाग | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | **श्री. एम.आर.हरणे** | **औरंगाबाद** | **तहसिलदार सोयगाव, जि.औरंगाबाद या श्री. रमेश जसवंत यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर** |

२. उपरोक्त अधिका-याला महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटपाबाबतच्या अधिसूचना विचारात घेऊन महसूली विभाग वाटप करण्यात येत आहे.

३. श्री. रमेश जसवंत, तहसिलदार यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

४. सदर पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिका-यांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये.

५. सदर पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्यासाठी सध्याच्या पदावरील कार्यभार कार्यालय प्रमुखाच्या सल्ल्याने तात्काळ अन्य अधिका-यांकडे सुपुर्द करुन पदोन्नतीने देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या पदावर रुजू व्हावे.

६. या आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या पदावर १५ दिवसाच्या आत रुजू न झाल्यास संबंधित अधिका-यांना पदोन्नतीचे लाभ अनुज्ञेय होणार नाहीत.

**७.** नायब तहसिलदार संवर्गातून तहसिलदार या संवर्गात पदोन्नत झालेल्या उपरोक्त अधिका-यांनी पदस्थापनेच्या पदावर रुजू होऊन कार्यभार स्वीकारल्यानंतरच तहसिलदार एस-१९-(रू. ५५१००-१७५१००) या संवर्गाच्या वेतनाचे लाभ अनुज्ञेय राहतील.

८. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-३०२२/प्र.क्र.२०६/ई-३, दि.२०.०४.२०२३ नुसार निश्चित केलेल्या अटी व शर्ती या कायम लागू राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०५१८४७५७९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f9815c89488c717b56e1ae0b06802c87d325011b06b9fb279823a37e0511b2, pseudonym=06DBBC5D80F944565DD5BDEF080730B6FF4B904B, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2023.07.05 18:50:06 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद.

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
४. संबंधित जिल्हाधिकारी.
५. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
८. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
९. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचेमार्फत).
११. सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. निवडनस्ती (ई-३).